**भूसंपादन - मौजे गौरीपाडा, ता.भिवंडी, जि.ठाणे न्यायालयीन निर्णयानुसार वाढीव मोबदला देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

महसूल व वन विभाग,

शासन निर्णय क्र. आरएलएफ-२०१४/प्र.क्र.११०/म-३

मंत्रालय,मुंबई-४०००३२.

दिनांक : २ जुलै, २०१४

वाचा

१) महसूल व वन विभाग, शासन ज्ञापन क्र.आरएलएफ-२७८७/प्र.क्र.३३२६/म-३ दिनांक २९ ऑक्टोबर, १९९३,

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.न्याखभ-१०.०२/प्र.क्र.२/अर्थसंकल्प-२, दि.१३ सप्टेंबर, २००२

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.भूसंपादन मोबदला-८६७४/२००४-२००५, प्र.क्र.३०/अ-४, दि.२५ नोव्हेंबर, २००४

४)जिल्हाधिकारी, ठाणे यांचे पत्र क्र.सामान्य/का-४/टे-३/भूसं/कावि/१३८/२०१४, दि.२१.२.२०१४

५) जिल्हाधिकारी, ठाणे यांचे पत्र क्र.सामान्य/का-४/टे-३/भूसं/कावि/२९५/२०१४, दि.१७.५.२०१४

प्रस्तावना

भिवंडी येथे मे, १९८४ मध्ये झालेल्या जातीय दंगलीमध्ये जळीतग्रस्तांचे पुनर्वसन करण्यासाठी मौजे गौरीपाडा, ता.भिवंडी येथील सर्व्हे नं.२६ क्षेत्र ०-३७-० हे.आर. व सर्व्हे नं.६१/१ पैकी क्षेत्र ०-१६-० हे.आर. येथील संपादित केलेल्या जमिनीच्या संबंधात भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम ११ अन्वये विशेष भूसंपादन अधिकारी, ठाणे यांनी दि.१९/११/१९९७ रोजी निवाडा घोषित केला होता.सदर निवाड्याची रक्कम मान्य नसल्याने भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ अन्वये वाढीव मोबदला मिळण्यासाठी सहदिवाणी न्यायाधीश, ठाणे येथे श्री.लक्ष्मण गोपाळ टावरे (मयत-

दि.१८.११.१९९८) यांचे वारसदार यांनी दाखल केलेल्या भू संपादन संदर्भ क्र.६/९९ मध्ये दि.२१.१२.२००२ रोजी दिलेल्या आदेशाविरुध्द राज्य शासनाने उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ येथे दाखल करण्यात आलेल्या प्रथम अपिल (स्टॅम्प) क्रमांक ३६६१०/२००३ मध्ये दि.६/८/२००४ रोजी देण्यात आलेल्या अंतरिम आदेशाच्या अनुषंगाने रु.४३ लाख इतकी रक्कम न्यायालयात भरणा करण्यात आली आहे. तद्नंतर प्रस्तुत प्रकरणी मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दाखल करण्यात आलेल्या प्रथम अपिल क्र. ३१२/२००५ मध्ये दिनांक २० नोव्हेंबर, २०१२ रोजी दिलेल्या अंतिम निकालामध्ये वाढीव मोबदला देण्याचे आदेश दिले आहेत. या निकालाविरुध्द अपील दाखल करण्याची आवश्यकता नसल्याचे मत विधी व न्याय विभागाने व्यक्त केले आहे.दरम्यान उच्च न्यायालयाने दि.२०/११/२०१२ रोजी दिलेल्या निकालाच्या अनुषंगाने श्री.लक्ष्मण गोपाळ टावरे यांच्या वारसदारांनी जिल्हा न्यायालय, ठाणे येथे दरखास्त क्र.२/२००३ दाखल केले आहे. सदर दरखास्तीच्या सुनावणीदरम्यान शासनाकडून निधी उपलब्ध करुन तो न्यायालयात तातडीने जमा करण्याचे निदेश मा.उच्च न्यायालयाने दिले आहेत. मा.न्यायालयाच्या उक्त निर्णयानुसार जिल्हाधिकारी, ठाणे यांनी संदर्भाधीन दिनांक २१.२.२०१४ व १७.५.२०१४ अन्वये भूसंपादनाची रु.४०,५९,०८६/- इतक्या रक्कमेची (जमिनीचा मोबदला व दि.३० जून, २०१४ पर्यंत गणना केलेल्या व्याजाच्या रकमेसह ) मागणी केली आहे. तसेच न्यायालयाच्या निदेशानुसार शासनाच्या प्रतिभूती ठेवीतून रु.४३,००,०००/- इतकी रक्कम यापूर्वी न्यायालयात भरणा करुन ती जमीन मालकास अदा करण्यात आली आहे. सदर रक्कम समायोजित करण्यासाठी रु.४३,००,०००/- इतकी रक्कम संबंधित लेखाशीर्षाखाली उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. एकंदरीत मा.न्यायालयाच्या निर्णयानुसार भूसंपादनाची रक्कम रु.८३,५९,०८६/- इतकी रक्कम मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय

मौजे गौरीपाडा, ता.भिवंडी, जि.ठाणे येथीलसर्व्हे नं.२६ क्षेत्र ०-३७-० हे.आर. व सर्व्हे नं.६१/१ पैकी क्षेत्र ०-१६-० हे.आर. या जमिनीच्या भूसंपादनाच्या दाव्यापोटी एकूण रु.८३,५९,०८६/- (अक्षरीरुपये त्र्याऐंशी लाख एकोणसाठ हजार शहाऐंशी फक्त)इतकी रक्कम या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येत आहे.

२. वरील मंजूर रकमेपैकी उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार न्यायालयात भरणा करण्यासाठी उर्वरित वाढीव मोबदलारु.४०,५९,०८६/-(अक्षरीरुपये चाळीस लाख एकोणसाठ हजार शहाऐंशी फक्त)इतकी रक्कम जिल्हाधिकारी, ठाणे यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. सदर रक्कम तातडीने न्यायालयात भरणा करण्याची दक्षता जिल्हाधिकारी/ उपविभागीय अधिकारी, भिवंडी विभाग तथा भूसंपादन अधिकारी, भिवंडी, जि.ठाणे यांनी घ्यावी. सदर रकमेचा तपशील पुढीलप्रमाणे आहे —

| अ. क्र. | संपादित केलेली जमीन व क्षेत्र | न्यायालयाने दिलेली एकूण वाढीव मोबदला रक्कम (३०%दिलासा व १२ % अतिरिक्त घटक रकमेसह) | कलम ११ खाली देण्यात आलेली/अदा केलेली रक्कम | कलम २८खाली परिगणीत होणारे व्याज (जून, २०१४ पर्यंत) | न्यायालयात जमा केलेली रक्कम | व्याजासहित अनुज्ञेय होणारी व अदा करावयाची वाढीव मोबदल्याची एकूण रक्कम रूपये |
|---|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** |
| | सर्व्हे नं.२६, क्षेत्र ०-३७० हे.आर. | ४२,५०,३२७/- | १०,८९,३८१/- | | | |
| | सर्व्हे नं.६०/१ पैकीक्षेत्र ०-१६-० हे.आर. | २०,०३,५८२/- | १८,४२,८८७/- | २८,७७,८१३/- | ४३ लाख | ४०,५९,०८/- |
| | **एकूण** | **६२,५३,९०९/-** | **२९,३२,२६८/-** | **२८,७७,८१३/-** | **४३ लाख** | **४०,५९,०८६/-** |

३. सदर मंजूर केलेली रक्कम न्यायालयात जमा करुन न्यायालयाच्या निदेशानुसार पुढील आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी. कोणत्याही खातेदारास न्यायालयामार्फत कोणत्याही बाबतीत दुहेरी फायदा मिळणार नाही याची दक्षता जिल्हाधिकारी / उपविभागीय अधिकारी, भिवंडी विभाग तथा

भूसंपादन अधिकारी, भिवंडी, जि.ठाणेयांनी घ्यावी आणि केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास पाठवावा.

४. प्रस्तुत प्रकरणी भूसंपादन संदर्भ क्र.६/९९ मध्ये दि.२१.१२.२००२ रोजी दिलेल्या आदेशाविरुध्द राज्य शासनाने उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ येथे दाखल करण्यात आलेल्या प्रथम अपिल (स्टॅम्प) क्रमांक ३६६१०/२००३ मध्ये दि.६/८/२००४ रोजी देण्यात आलेल्या अंतरिम आदेशाच्या अनुषंगाने संदर्भाधीन दि.२५ नोव्हेंबर, २००४ च्या शासन निर्णयान्वये मंजूर केलेली रु.४३,००,०००/- (अक्षरी रुपये त्रेचाळीस लाख फक्त) इतकी रक्कम "८६७४-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी-१०१-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रकमा" या लेखाशीर्षामधूनन्यायालयात भरणा करण्यात आली आहे.

वित्त विभाग परिपत्रक क्र.न्याखभ-१०.०२/प्र.क्र.२/अर्थसंकल्प-२, दि.१३ सप्टेंबर, २००२ नुसार "८६७४-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी-१०१-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रकमा" या लेखाशीर्षामधून खर्च करण्यात आलेली रक्कम समायोजित करणे आवश्यक आहे. त्यामुळे यापूर्वी न्यायालयात भरणा करण्यात आलेली रु.४३,००,०००/- (अक्षरी रुपये त्रेचाळीस लाख फक्त) इतकी रक्कम "८६७४-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी-१०१-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रकमा (संगणक संकेतांक ८६७४ ५०१२)" या लेखाशीर्षाखाली भरणा करण्यात यावी.

५. याबाबतीत होणारा खर्च हा "मागणी क्र.सी-५, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०, इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, २००- इतर कार्यक्रम, २०० (०१) (०१) दंगलग्रस्त भागातील झळ पोहोचलेल्या व्यक्तींना सहाय्य (२२३५२९३१) (भारित) ३१ सहायक अनुदाने" या लेखाशीर्षाखाली पुरवणी मागणीव्दारे मंजूर करण्यात आलेल्या रु.८३,६०,०००/- (अक्षरी रुपये त्र्याऐंशी लाख साठ हजार फक्त) इतक्या रकमेमधून भागविण्यात यावा व तो त्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३०३/२०१४/व्यय-९, दि.२१/५/२०१४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१६१०५३१६९९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Rajaram Jagtap

Digitally signed by Ashok Rajaram Jagtap
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Rajaram Jagtap
Date: 2014.08.20 18:24:42 +05'30'

(अ.रा.जगताप)

अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

१) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, मुंबई
२) जिल्हाधिकारी, ठाणे
३) उपजिल्हाधिकारी (भूसंपादन समन्वय) जिल्हाधिकारी कार्यालय, ठाणे
४) उपविभागीय अधिकारी, भिवंडी विभाग तथा भूसंपादन अधिकारी, भिवंडी, जि.ठाणे
५) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे
६) जिल्हा सरकारी वकील, ठाणे
७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर
८) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर
९) वित्त विभाग (अर्थसंकल्प शाखा-२/४/व्यय-९),मंत्रालय,मुंबई
१०) कक्ष अधिकारी,अ-१/अ-२/अ-४/ब-१/पीएसी/पीएसी-१कार्यासने,म.व व.वि.,मंत्रालय,मुंबई-३
११) निवडनस्ती (म-३कार्यासन) महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई ३२